**सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखालील बृहन्मुंबईमधील शासकीय सेवा निवासस्थानांचे अर्ज ऑनलाईन स्विकारण्यासाठी संगणक प्रणाली (Website) सुरु करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शानिवा- १५११/प्र.क्र.१४८/११/२३-अ**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.**
**तारीख: ३० डिसेंबर, २०१४.**

**शासन निर्णय :-**

बृहन्मुंबईमधील सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखालील शासकीय सेवा निवासस्थानांचे वाटप ऑनलाईन स्विकारण्यासाठी एक स्वतंत्र संगणक प्रणाली (वेबसाईट) तयार करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. शासनाने आता महाऑनलाईन लिमिटेड MahaOnline Limited - Joint Venture Company of Govt. of Maharashtra and TCS या कंपनीच्या सहकार्याने www.gqms.maharashtra.gov.in ही संगणक प्रणाली (वेबसाईट) तयार केलेली आहे.

२. बृहन्मुंबईतील शासकीय विभाग / कार्यालये यांचे प्रमुख तसेच त्यांच्या अधिपत्याखाली कार्यरत असलेल्या सर्व शासकीय अधिकारी / कर्मचा-यांना याद्वारे सूचना देण्यात येत आहेत की, **दि.१.१.२०१५** पासून शासकीय सेवा निवासस्थानांच्या मागणीसंदर्भातील अर्ज सादर करण्यासाठी उपरोक्त संगणक प्रणालीचा वापर करावा.

३. शासकीय निवासस्थानांच्या मागणीसंदर्भातील अर्ज सादर करणे व त्यावर पुढील कार्यवाही करण्यासाठी शासकीय अधिकारी / कर्मचा-यांनी तसेच विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुखांनी पुढील कार्यपध्दतीचा अवलंब करावा

अ) यापुढे शासकीय सेवा निवासस्थानासंबंधातील अर्ज शासकीय अधिकारी / कर्मचाऱ्यांनी सामान्य प्रशासन विभागाकडे त्यांच्या विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुखांमार्फत ऑनलाईन सादर करणे आवश्यक आहे.

ब) यासाठी विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुखांनी, सामान्य प्रशासन विभागातील कार्यासन-२३-अ येथे संपर्क साधून अर्जदारास त्याचा निवासस्थानाच्या मागणीबाबतचा अर्ज ऑनलाईन विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुखांकडे पाठविण्यासाठी " अर्जदाराचा क्रमांक" व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुखांनी सामान्य प्रशासन विभागातील कार्यासन-२३-अ कडे सदर अर्ज पुढील कार्यवाहीस्तव पाठविण्यासाठी "विभाग / कार्यालय प्रमुखाचा क्रमांक " असे दोन " युजर आय.डी. क्रमांक " (User I.D. No.) प्राप्त करणे आवश्यक आहे.

क) विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुखांनी वर नमूद केल्याप्रमाणे सामान्य प्रशासन विभागाकडून प्राप्त केलेला अर्जदाराचा " युजर आय.डी. क्रमांक " (User I.D. No.)" अर्जदारास देऊन त्यास त्याचा निवासस्थानाच्या मागणीबाबतचा अर्ज त्यांच्या कार्यालयाकडे ऑनलाईन पाठविण्याच्या सूचना दयाव्यात.

ड) शासकीय निवासस्थानाची गरज असलेल्या शासकीय अधिकारी / कर्मचा-यांनी उपरोक्त वेबसाईटवर शासकीय निवासस्थानाच्या मागणीसाठी अर्ज भरावा व सदर अर्ज तसेच त्यासोबत आवश्यक असलेली कागदपत्रे स्कॅनिंग करुन उपरोक्त " युजर आय.डी. क्रमांकाचा " वापर करुन त्यांच्या कार्यालयाशी संबंधित " विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख " यांच्याकडे ऑनलाईलन पाठवावीत.

ई) संबंधित विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुखांनी सदर अर्ज प्राप्त झाल्यावर संबंधित अर्जदार ज्या कार्यालयात कार्यरत असेल, ते कार्यालय त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालय आहे किंवा कसे, त्याचप्रमाणे संबंधित अधिकारी / कर्मचारी सदर कार्यालयाच्या आस्थापनेवरील नियमितरित्या (महाराष्ट्र लोकसेवा आयोग, निवड मंडळे इ. मार्फत नियुक्त तसेच अनुकंपा तत्त्वावर नियुक्त) नियुक्त झालेले अधिकारी / कर्मचारी आहेत किंवा कसे त्याचप्रमाणे त्यांचा जन्मदिनांक व सेवानिवृत्तीचा दिनांक इ. अर्जदाराने नमूद केलेली सर्व माहिती तपासावी व ती योग्य असल्यास तसेच संबंधित अधिकारी / कर्मचा-यांनी अर्जातील माहिती संपूर्ण भरलेली असल्यास व आवश्यक त्या कागदपत्रांची पूर्तता केली असल्यास त्यांचा अर्ज उपरोक्त विभाग/ कार्यालय प्रमुखांच्या " युजर आय.डी. क्रमांकाचा " वापर करुन सामान्य प्रशासन विभागाकडे ऑनलाईन पाठवावा.

फ) अर्जदाराने ऑनलाईन पाठविलेल्या अर्जात काही त्रुटी असल्यास विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुखांनी सदर त्रुटी नमूद करुन अर्जदाराचा अर्ज अर्जदाराकडे ऑनलाईन परत पाठवावा. तदनंतर अर्जदाराने सदर त्रुटींची पूर्तता करुन प्रस्तूत अर्ज पुन:श्च नव्याने संबंधित विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुखांकडे ऑनलाईन पाठवावा.

ग) विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुखांकडून, सामान्य प्रशासन विभागाकडे ऑनलाईन अर्ज पाठविण्यात आल्यावर सदर अर्जास एक ऑनलाईन क्रमांक (Application Number ) देण्यात येईल. अर्जदाराने सदर ऑनलाईन क्रमांकाची नोंद करुन घ्यावी जेणेकरुन सदर अर्जाबाबतची स्थिती त्यास वेळोवेळी तपासणे शक्य होईल.

ह) सामान्य प्रशासन विभागाकडे अर्जदाराचा अर्ज, विभाग / कार्यालय प्रमुखांमार्फत ऑनलाईन प्राप्त झाल्यावर सदर अर्जाची तपासणी सामान्य प्रशासन विभागात करण्यात येईल. सामान्य प्रशासन विभागास सदर अर्जामध्ये काही त्रुटी आढळल्यास सदर त्रुटींचा उल्लेख करुन तो अर्ज पुन:श्च विभाग प्रमुख /कार्यालय प्रमुखांकडे ऑनलाईन परत पाठविण्यात येईल. विभाग प्रमुख /कार्यालय प्रमुखांनी संबंधित अधिकारी / कर्मचा-यांशी संपर्क साधून सदर त्रुटींची पूर्तता करून घ्यावी व परिपूर्ण माहितीसह अर्ज सामान्य प्रशासन विभागाकडे ऑनलाईन परत पाठवावा.

ज) सामान्य प्रशासन विभागाकडे पाठविण्यात आलेला ऑनलाईन अर्ज जर परिपूर्ण स्थितीत असेल तर तो सामान्य प्रशासन विभागामार्फत स्विकृत करण्यात येईल व अर्जदाराचे नाव संबंधित प्रतिक्षायादीत अंतर्भूत करण्यात येईल.

४. दि.१.१.२०१५ नंतर शासकीय सेवा निवासस्थानांच्या मागणीसाठी वरील कार्यपध्दतीनुसार पाठविण्यात आलेले ऑनलाईन अर्जच स्विकारण्यात येतील. तरी यापुढे उपरोक्त ऑनलाईन पध्दतीचा वापर करण्याच्या सूचना सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना याद्वारे देण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१४१२२६१५२५५३७८०७** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489ca14b4e0f644bf05a04e89c, cn=Bhaurao Raghunath Gavit
Date: 2015.01.30 13:08:46 +05'30'

**( भा. र. गावित )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई- ४०० ००६.
२. सर्व सन्माननीय संसद सदस्य, विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
३. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
४. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई,
६. सचिव, लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने),
७. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
८. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
९. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
१०. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
११. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. प्रधान सचिव (माहिती तंत्रज्ञान), मंत्रालय, मुंबई .
१३. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई,
१४. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१७. अधीक्षक अभियंता, मुंबई मंडळ, मुंबई,
१८. कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई विभाग, अंधेरी (प), मुंबई - ४०० ०५८,
१९. कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, २५, मर्झबान पथ, मुंबई-४०० ००१,
२०. कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई (सा.बां.) विभाग, वरळी, मुंबई-४०० ०१८,
२१. कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई विभाग, अंधेरी (प), मुंबई - ४०० ०५८,
२२. उप अभियंता, पश्चिम उप विभाग (सा.बां.), मलबार हिल, मुंबई-४०० ००६,

२३. उप अभियंता, दक्षिण उप विभाग, एम.टी.डी.सी.कार्यालयासमोर,मुंबई- ४०० ०२०,
२४. उप अभियंता, मध्य मुंबई (सा.बां.) विभाग, वरळी, मुंबई-४०० ०१८,
२५. सक्षम प्राधिकारी, बृहन्मुंबई, जुने जकात घर, मुंबई -४०० २३,
२६. सर्व मंत्रालयीन विभाग,
२७. सर्व विभागीय आयुक्त,
२८. बृहन्मुंबईतील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
२९. निवड नस्ती.